**ग्रंथालय संचालनालयाच्या आस्थापनेवरील तांत्रिक सहाय्यक/ग्रंथालय निरीक्षक / वितरण सहाय्यक/ जिल्हा ग्रंथपाल (गट-क) यांना सहाय्यक ग्रंथालय संचालक/जिल्हा ग्रंथालय अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या पदावर पदोन्नती देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : मराग्रं-२०२३/प्र.क्र.२२/ग्रं.क.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२४.

ग्रंथालय संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-क मधील तांत्रिक सहाय्यक/ ग्रंथालय निरीक्षक / वितरण सहाय्यक/जिल्हा ग्रंथपाल पदावरील पुढील कर्मचाऱ्यांना सहाय्यक ग्रंथालय संचालक / जिल्हा ग्रंथालय अधिकारी, गट-ब (राजपत्रित) पदावर ( एस-१५ : ४१८०० – १३२३००) या आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देऊन त्यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव, पदनाम व कार्यालय | ज्येष्ठता क्रमांक | वाटप झालेला महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | श्री.रामदास बा.साठे, ग्रंथालय निरीक्षक, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, सातारा | २ | नागपूर | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, शासकीय विभागीय ग्रंथालय, नागपूर. |
| २ | श्री.अतुल पुं.वानखडे, तांत्रिक सहाय्यक, शासकीय विभागीय ग्रंथालय, छ.संभाजीनगर | ५ | अमरावती | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, अकोला. |
| ३ | श्री.सुनिल अ.जगताप, तांत्रिक सहाय्यक, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, जळगांव | ६ | नाशिक | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, नाशिक. |
| ४ | श्री.शशांक दि.नाईक, तांत्रिक सहाय्यक, शासकीय विभागीय ग्रंथालय, रत्नागिरी | ७ | कोकण-**१** | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, डॉ.बाबासाहेब आंबेडकर स्मृती ग्रंथालय, दापोली, जि.रत्नागिरी. |
| ५ | श्री.रत्नाकर चं.नलावडे, ग्रंथालय निरीक्षक, सहायक ग्रंथालय संचालक कार्यालय, नागपूर | ८ | नागपूर | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, चंद्रपूर. |
| ६ | श्री.हनुमान भा.ढाकणे, तांत्रिक सहाय्यक, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, अहमदनगर | १० | छ.संभाजीनगर | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, धाराशिव. |
| ७ | श्री.खुमेंद्र भै.बोपचे, तांत्रिक सहाय्यक, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, वाशिम | ११ | नागपूर | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, भंडारा. |
| ८ | श्रीमती वंदना सु.काटकर, वितरण सहाय्यक, शासकीय विभागीय ग्रंथालय, पुणे | १२ | छ.संभाजीनगर | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, लातूर. |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव, पदनाम व कार्यालय | ज्येष्ठता क्रमांक | वाटप झालेला महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| ९ | श्री.नितिन त्र्यं.सोनोने, तांत्रिक सहाय्यक, शासकीय विभागीय ग्रंथालय, नागपूर | १३ | नागपूर | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, वर्धा. |
| १० | श्रीमती मिनल स.टेंबे, तांत्रिक सहाय्यक, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, नाशिक | १४ | कोकण-२ | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, रायगड. |
| ११ | श्री.चंद्रशेखर भा.ठाकूर, तांत्रिक सहाय्यक, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, धुळे | १५ | छ.संभाजीनगर | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, जालना. |
| १२ | श्री.योगेश रा.बिर्जे, तांत्रिक सहाय्यक, शासकीय विभागीय ग्रंथालय, पुणे. | १६ | कोकण-२ | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय, मुंबई. |
| १३ | श्री.सुनिल पुं.पाटील, तांत्रिक सहाय्यक, शासकीय विभागीय ग्रंथालय, पुणे | १७ | अमरावती | जिल्हा ग्रंथालय अधिकारी, जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, बुलढाणा. |

**०२.** उपरोक्त पदोन्नती खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे :-

(१) सदर पदोन्नती आदेश मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दिनांक २५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब कार्यासनाच्या दिनांक ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार करण्यात येत आहे. तसेच, दिनांक ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

(२) सदरची पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात येत आहे.

(३) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत शासन सा.प्र.वि./१६-अ यांनी दिनांक २०.०४.२०२३ रोजी दिलेल्या सूचनांनुसार सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

(४) सदर तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(५) निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

(६) निवडसूचीतील उक्त अधिकाऱ्यांना पदोन्नती देताना महाराष्ट्र शासकीय गट - अ व गट- ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप

अधिसूचना २०२१ दिनांक १४.०७.२०२१ मधील तरतूदीनुसार महसूली विभाग वाटपाची कार्यवाही करण्यात आली आहे.

(७) उक्त आदेशातील अधिकाऱ्यांनी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग दिनांक ०१.०८.२०१९ मध्ये विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषांची पूर्तता केली आहे.

(८) सदर आदेशातील कर्मचाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास त्या संदर्भात शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग दिनांक १२.०९.२०१६ मधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

**०३.** उपरोक्त नमूद कर्मचाऱ्यांविरुध्द, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित / न्यायालयीन प्रकरण /FIR दाखल नसल्याच्या अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत. याबाबत आवश्यक ती खातरजमा ग्रंथालय संचालक यांनी करावी.

**०४.** संबंधित अधिकाऱ्यांस पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होण्याकरीता त्यांच्या कार्यालय प्रमुखांनी कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी. तसेच, संबंधित अधिकारी यांनी पदोन्नती आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत पदोन्नतीच्या पदावर रुजू व्हावे व त्याबाबतचा अहवाल ग्रंथालय संचालक यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

**०५.** सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने व शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**०६.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाचे www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१४१९३७२९९५०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2024.03.14 19:49:37 +05'30'

**(प्रताप पां. लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल – १/ २, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.

८. अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. सर्व सहाय्यक ग्रंथालय संचालक/ जिल्हा ग्रंथालय अधिकारी ( ग्रंथालय संचालनालयामार्फत)
११. संबंधित सर्व कर्मचारी ( ग्रंथालय संचालनालयामार्फत)
१२. निवडनस्ती / ग्रंथालय कक्ष, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.